# हेन्री

खूप लोक असे मानतात की हेन्री फोर्डने ऑटोमोबाइलचा शोध लावला. पण हा सन्मान जर्मन आविष्कारक कार्ल बेंज यांना जातो. पण हेन्रीने ऑटोमोबाइल उद्योगासाठी जे काही केलं ते नेहमी लक्षात ठेवलं जाईल.

फोर्डचा सगळ्यात मोठा शोध मॉडल-टी कार होता. मॉडल-टी संयुक्त राज्य अमेरिकेची एक मोठी सफलता होती. ती अमेरिकेच्या श्रमिक वर्गासाठी स्वस्त होती. फोर्डने कार उत्पादनाला स्वस्त करण्यासाठी असेम्ब्ल करण्याचा मार्ग स्वीकारला.

फोर्डने कार खरीदण्यासाठी लोकांना पैसे उधार देण्यासाठी एक क्रेडिट कंपनी काढली. लोक व्याजा बरोबर छोटा मासिक हप्तापण भरत असत. नंतर कार खरीदण्याचा हा सगळ्यात लोकप्रिय प्रकार झाला.

हेन्री फोर्डने कार उद्योगाला आपल्या नव्या पद्धतीने बदलून टाकले. भरपूर मेहनत आणि एक अभिनव विचाराने त्यांना साथ दिली.

हेन्री फोर्ड नंतरच्या काळात आपण तयार केलेल्या गाडीत बसलेले.

# सुरुवातीचे दिवस

हेन्री फोर्डचा जन्म 30 जुलै १८६३ ला झाला. त्यांचे सुरुवातीचे दिवस मिशिगनच्या डियरबर्न मध्ये घालवले. ते आपल्या कुटुंबाच्या शेतात काम करत असत. त्यांना शेतीकाम आवडत नसे कारण त्यांना ते काम कंटाळवाणे वाटत असे. रिकाम्या वेळात हेन्री वर्कशॉपमध्ये काम करत असत. त्यांना यंत्राचे डिझाईन आणि यंत्र निर्माण करण्याची इच्छा होती. त्यांना पक्के माहित होते की एक दिवस नांगराचे आणि गाड्यांचे काम यंत्राद्वारे होईल.

हेन्री एक चांगले विद्यार्थी होते. त्यांचा आवडता विषय गणित होता आणि त्यात त्यांनी उत्कृष्ट कामगिरी केली. त्यांच्या अंकगणित कौशल्याचा उपयोग त्यांना कारच्या डिझाईनसाठी झाला.

हेन्री फोर्ड लहान मुलाच्या रुपात.

# पहिली नोकरी

हेन्रीने १७ वर्षाचा असतांना घर सोडले. त्याला काही वेगवेगळ्या गोष्टींच्याबाबत शिकायचं होतं. म्हणून तो डेट्रायटला गेला आणि तिथं त्याने फ्लावर मशीन शॉप मध्ये नोकरी केली. दुकानात मोठे पितळ आणि लोखंडाचे व्हाल्व आणि आग विझवण्यासाठी उपकरण तयार केले जात होते.पण हेन्री लवकरच त्या कामाने थकला आणि नऊ महिन्यानंतर त्याने नोकरी सोडली. हेन्रीची पुढची नोकरी अशी होती की, ज्यात त्याला खूप रुची होती. तिथं त्याला खूप मौल्यवान अनुभव मिळाला. त्याने डेट्रायट ड्रायडॉक कंपनी मध्ये काम केले, जी स्टीमशिप इंजिन निर्माण करण्याचे काम करत होती.

हेन्री १८८२ मध्ये एक प्रमाणित मशीन-मिस्त्री झाला. वेस्टिंगहाउस कंपनीने त्याला मिशिगन च्या आसपास स्टीम इंजिन लावण्यासाठी आणि त्यांची देखभाल करण्यासाठी ठेवलं. हेन्री नेहमी वजनाने हलके आणि अधिक शक्तिशाली इंजिन निर्माण करण्याच्या उपायाच्याबाबत विचार करत असे.

एडिसन इल्लुमिनाशन कंपनीचे कर्मचारी.
हेन्री फोर्ड सगळ्यात वरच्या रांगेत आहेत, उजवीकडून तिसरे.

१८८८ मध्ये हेन्रीने वर्कशॉपमध्ये हलक्या इंजिनवर काम केले. १८९१ पर्यंत हेन्रीने एक छोट्या इंजिनचे डिझाईन बनवले होते, जे घासलेटवर चालत असे. हेन्रीच्या इंजिनाबद्दलच्या ज्ञानामुळे

थॉमस एडिसनने त्याला एडिसन इल्लुमिनेटिंग कंपनी मध्ये चीफ इंजीनियरची नोकरी दिली. हेन्रीने ते जनरेटर चालवले ज्यामुळे ग्राहकांची वीजेची मागणी पूर्ण झाली. १८९३ मध्ये फोर्डने आपला मुलगा – एदसेलच्या जन्माचा आनंद साजरा केला.

# त्यांची पहिल्या कार

१८९४मध्ये हेन्रीने शेवटी आपली पेट्रोलवर चालणाऱ्या कारची निर्मिती केलीच. त्यांनी इंजिन चार चाकाच्या गाडीवर ठेवलं आणि मग त्यातून प्रवास केला.शेजाऱ्यांनी हेन्री फोर्डकडे मोठ्या आश्चर्याने पाहिलं. त्यांनी त्यागाडीला, "बिना घोड्यांची गाडी"असे नाव दिले आणि मग ती विकायला सुरुवात केली. हेन्रीला सगळा वेळ कार तयार करण्यासाठी घालवायचा होता म्हणून त्यांनी एडिसन इल्युमिनेटिंगची नोकरी सोडून दिली. आता त्यांना शांत,मजबूत इंजिनचे डिझाईन तयार करायचे होते.

जून १९०३ पर्यंत हेन्रीने डेट्रायटमध्ये एक छोटी फॅक्टरी सुरु केली, जिला फोर्ड मोटर कंपनी म्हटले जात होते. त्यांनी कारच्या निर्मितीसाठी १० श्रमिक कामाला ठेवले.

## पहिली कार

तो माणूस ज्याने जगात सगळ्यात आधी चाकांच्या गाडीतून प्रवास केला. हेन्री फोर्ड, १८९६मध्ये तयार केलेल्या आपल्या पहिल्या कार सोबत

१९०३मध्ये बनी मॉडल-A कार.

पहिली ऑटोमोबाइल (गाडी) एका महिन्यांत तयार होवून बाहेर मॉडल-ए म्हटले गेले. यात दोन फॉरवर्ड स्पीड, रिवर्स गियर आणि 30 मैल (४८ किलोमीटर) प्रति तास वेग होता. प्रत्येक कारची किंमत ८५० डॉलर होती. पुढच्या महिन्यात फोर्डने एका दिवसात १५ कार बनवू लागला.

पहिल्या वर्षी हेन्रीने खूप तास काम केले. ते नेहमी आपल्या कामगारांना मदत करत असत. त्यांच्या कष्टामुळे त्यांचा व्यवसाय १९०५ पर्यंत एवढा चांगला चालला की त्यांना आपला पहिला कारखाना सोडून द्यावा लागला. कंपनीने एक नवी फाक्टरी काढली, जी पहिल्या फाक्टरी पेक्षा १०पट मोठी होती. हेन्री जगातले सगळ्यात प्रसिद्ध कार निर्माते होण्याच्या मार्गावर होते.

## मॉडल-टी

मॉडल-ए ला यश मिळाल्याने हेन्रीला कळले की लोक कार विकत घ्यावी वाटते.कारच्या निर्मितीत चांगले भविष्य आहे असे त्यांना वाटले म्हणून त्यांनी स्वस्त कार तयार करण्याचे ठरवले. जी सगळेजण खरेदी करू शकतील.

हेन्रीने म्हटले, "ऑटोमोबाइल करण्याचा एक चांगला मार्ग म्हणजे एक ऑटोमोबाइल दुसऱ्या ऑटोमोबाइलसारखी बनवा. जर तुम्ही एकाच डिझाईनच्या कार बनवल्या तर तिची संख्या वाढेल आणि मग कारची किंमत कमी होईल, स्वस्त होईल. मी अशीच एक कार बनवू इच्छितो जी प्रत्येक काम करणारा माणूस खरेदी करू शकेल." हेन्रीने १९०८मध्ये या कारचे मॉडल-टी निर्माण केले." मॉडल-टी कार मुळे अमेरिकेचा चेहरा कायमस्वरूपी बदलून टाकला. कारच्या हुडने समोरच्या इंजिनला झाकून टाकले. तिचे चार सिलेंडर ४५ मैल प्रति घंटा वेग घेवू शकत होते आणि ही कार एक गॅलन पेट्रोलवर २० मैल चालत होती.

फोर्ड मोटर कंपनीचा गौरव : मॉडल-टी कार.

मॉडल-टी एवढी यशस्वी झाली की फोर्डला एका मोठ्या कारखान्याची आवश्यकता भासली. हेन्रीने जगातला सगळ्यात मोठा कारखाना काढण्याचे ठरवले. कारखाना कॉंक्रीट, लोखंड वापरून बनवला आणि त्यात भरपूर खिडक्या होत्या.नवा कारखाना क्रिस्टल राजवाडा म्हणून ओळखला जावू लागला. फोर्डचा हा कारखाना १९१० मध्ये चालू झाला.

# असेम्बली लाइन

नव्या कारखान्यात कामगारांनी मॉडल-टी एकाच प्रकारे असेंबल केली. त्यामुळे कारचे उत्पादन स्वस्त झाले. या विचारामुळे कार निर्मितीच्या क्षेत्रात क्रांती आली, आणि आता सामान्य अमेरिकी माणसाला कार खरेदी करणे सोप्पे झाले.

फोर्डने पारंपरिक पद्धतीने मॉडल-ए कार बनवली.कामगार कारखान्यात फरशीवर स्वतःच्या जागेवरच उभे राहत, आणि कार त्यांच्या समोरून जात असे. कार तयार करण्यासाठी कामगारांना प्रत्येक ठिकाणी कारचे सामान घेवून जावे लागत असे. पण असेंबली लाइन वरून मॉडल-टी पुढे जाई, तेव्हा कामगार एकाच ठिकाणी राहत. प्रत्येक कामगार कारचा एक भाग फिट करत असे. जसजशी मॉडल-टी कामगारांच्या समोरून जाई तसे कामगार एक एक भाग फिट करत.

लगतचे पान : मॉडल-टी फोर्सेस ॲसेम्ब्ली लाइन सोडल्यावर कार वितरणासाठी तयार.

अॅसेंबल लाइनच्या बरोबरच, प्रत्येक कारचा उत्पादन वेळ १२.५ तासाने कमी होवून २ तास ३८ मिनिटे झाला.१९१३ पर्यंत फोर्डने दरवर्षी २००,००० कार विकल्या.जानेवारी १९१४ पर्यंत प्रत्येक ९३ मिनिटात एक मॉडल-टी तयार होत होती.

हेन्रीने अॅसेंबली लाइनचा शोध लावला नव्हता.पण त्याने त्याचा चांगला उपयोग केला. आणि तो एक अमेरिकी हिरो झाला. आता बहुतेक सगळेजण कार खरेदी करू शकत होता. १९२४पर्यंत हेन्रीने एक करोड मॉडल-टी विकल्या. पण अचानक, १९२५ मध्ये मॉडल-टीची विक्री घटली. मॉडल-टी स्पर्धेत टिकली नाही. नवीन कारमध्ये एक सेल्फ स्टार्टर होता, ज्यात किल्ली फिरवली की इंजिन सुरु होत असे.

## नवीन मॉडल-ए

हेन्रीला ती कार बदलणे कठीण गेले जिने त्याला श्रीमंती आणि प्रसिद्धी दिली होती. त्याने नवीन मॉडेल करण्यावर जोर दिला.पण विक्रीत घट तशीच राहिली.

फोर्ड मोटर कंपनीने २५मे १९२७ला घोषणा केली ते एक नवीन कार बनवतील.तिला नवीन मॉडल-ए म्हटलं गेलं. घोषणा केल्यानंतर हेन्रीने मॉडल-टीला अच्छा केला.

"मॉडल-टी एक अग्रणी मॉडल आहे," त्यांनी पत्रकारांना सांगितलं. "गोष्टी बदलत आहे, नवीन कारच्या नव्या गरजा आहेत. पण मॉडल-टी च्या योगदानाचे नेहमीच अमेरिकेच्या इतिहासात एक विशेष स्थान राहील. ही एक अशी कार होती जी चांगल्या रस्त्याच्या आधी खराब रस्त्यांवर धावली. तिने अडचणींवर मत केली आणि तिने लोकांना एक-दुसऱ्यांच्या जवळ आणलं. आम्हांला आत्ताही मॉडल-टी फोर्ड वर गर्व आहे."

दुसऱ्या दिवशी हेन्रीने कारखान्यातल्या दीड करोडाव्या आणि शेवटच्या मॉडल-टी मध्ये प्रवास केला. मग कंपनीने आपल्या भल्यासाठी मॉडल-टी ॲसेंबली लाइन बंद केली. पहिलं नवीन मॉडल-ए ऑक्टोबर १९२७ मध्ये ॲसेंबली लाइनवरून बाहेर आले.

१ डिसेंबर १९२७ला कार डीलरांकडे त्याबाबत विचारपूस केली.सगळ्यांना नवीन मॉडेल पसंत आले होते. लवकरच जनतेने हजारो संख्येने नवीन मॉडेल खरेदी केले..

नवीन मॉडेल-ए, मॉडेल-टी च्या तुलनेत अधिक आधुनिक होते. यात एक शांत, अधिक शक्तिशाली चार सिलेंडरचे इंजीन होते. जे तासी ६५-मैल (१०५-किमी) जावू शकत होते. यात एक इग्निशन सिस्टम पण होती,ज्यामुळे कारला किल्ली फिरवली की सुरु होत असे. एवढंच नाही तर त्यात एक सेफ्टी-ग्लास विंडशील्ड पण होते, ज्याला तोडणे मुश्कील होते.

नवीन मॉडेल खूप यशस्वी झाले. १९२८ पर्यंत कंपनी रोज ६४०० कार बनवत होती. १९२९ मध्ये कंपनीने २० लाखाहून अधिक कार बनवल्या.

हेन्री फोर्ड (डावीकडे) अंतिम मॉडल-टी मध्ये प्रवास करतांना.

मॉडल-टीचा उत्तराधिकारी, नवीन मॉडेल-ए.

## फोर्डच्या समोर मोठ्या अडचणी

"नवीन मॉडेल-ए एक मोठं यश होतं. हेन्रीला वाटत होते की प्रत्येकाजवळ एक मॉडेल–ए असायला हवे. म्हणून त्याने लोकांना आपली फायनान्स कंपनी, यूनिवर्सल क्रेडिट कंपनीच्या माध्यमातून कार खरीदण्यासाठी व्याज घ्यायला सांगितले. फोर्डने खरेदीदारांना पैसे उधार दिले, जे ते मासिक हप्तामध्ये भरत असत. जवळजवळ प्रत्येकाने ज्याने मॉडेल-ए घेतले त्याने यूनिवर्सल कडून पैसे उधार घेतले. आजही अशाप्रकारे कार खरेदी करण्याचा लोकप्रिय प्रकार आहे. २९ ऑक्टोबर, १९२९ला शेयर बाजार खालावला. त्यामुळे पूर्ण अमेरिकेत दहशत पसरली.लोक आपले पैसे काढण्यासाठी आपआपल्या बँकेत धावले.

पण अधिकांश बैंकांजवळ पर्याप्त पैसे नव्हते,की ते सगळ्या खातेधारकांना त्यांचे पैसे परत करतील. कितीतरी बँका कारभारातून बाहेर आल्या.लाखो लोकांनी आपली बचत घालवावी लागली. खर्च करण्यासाठी पैसे नव्हते त्यामुळे अनेक व्यवसाय धुळीला मिळाले. आता लोकांकडे नोकरी नव्हती.एक महामंदी सुरु झाली होती.

सुरुवातीला शेयर बाजार दुर्घटना मुळे फोर्ड प्रभावित झाला नाही. हेन्रीने काहीच गमावले नाही. वास्तवात त्याच्याजवळ आपल्या कामगारांना देण्यासाठी पुरेशी रोकड होती. पण १९३१ पर्यन कारच्या विक्रीत घट झाली.कंपनीने पैसे गमावले आणि फोर्ड कंपनीला सगळ्यात वाईट हे वर्ष गेले.

हेन्रीला वादळाला झेलायचे माहित होते.त्याने फोर्ड v -८ नावाची नवीन कार निर्माण केली.त्यात एक आठ सिलेंडरचे इंजिन,एक नवीन ट्रांसमिशन आणि किंमत केवळ ४६० डॉलर होती.

V-८ खूप चांगल्या प्रकारे विकली गेली.१९३४ पर्यंत, फोर्ड मोटर कंपनी परत नफा कमावू लागली.

## लोकांचे जीवन बदलणे.

७डिसेंबर १९४१ला जपानने होनोलूलू मध्ये पर्ल हार्बर वर हवाई हमला केला. अचानक, अमेरिका पण दुसऱ्या विश्वयुद्धात सामील झाली, जे जर्मनीने १९३९ मध्ये युरोपमध्ये सुरु केले होते. अमेरिकेला जर्मनी आणि जपानबरोबर लढण्यासाठी अनेक टॅक्स आणि ट्रकची आवश्यकता होती.

हेन्रीने कारचे उत्पादन बंद केले आणि युद्ध उपकरण बनवणे सुरु केले. एवढंच नाहीतर त्याने डेट्रायटजवळ एक नवीन कारखाना उभारला. शेवटी, फोर्डने दरमाह ६५० बॉम्बर बनवले.

१९४३मध्ये खूप त्रास झाला जेव्हा एडसेल फोर्डचा कॅन्सरने मृत्यू झाला.त्यापेक्षा अधिक म्हणजे हेन्रीची तब्येत खराब होत होती. म्हणून ते आपल्या कंपनीचे प्रमुख झाले नाही. तेव्हा त्यांचा नातू हेन्री फोर्ड द्वितीय, नौसेनेतून परत आला आणि त्याने आपल्या आजोबांचा पदभार सांभाळला.

**आविष्कारक हेन्री फोर्ड**

हेन्री आपल्या नातवावर खुश होते.हेन्री द्वितीयने खूप मेहनत केली आणि कंपनी चांगली चालवण्यासाठी मदत केली.आता फोर्डचे भविष्य सुरक्षित होते.

हेन्रीने आपलं पूर्ण लक्ष फोर्ड फाउंडेशन मध्ये घातलं. फोर्ड फाउंडेशनने शाळा, संग्रहालये आणि अन्य सामाजिक संस्थाना पैसा दिला.

१९४७मध्ये पक्षाघाताने ८४ वर्षाच्या हेन्री फोर्डचे निधन झाले. त्यांनी आपले अधिकतर धन फोर्ड फाउंडेशन साठी ठेवले. हा पैसा सामाजिक कार्यासाठी खर्च केला. फोर्ड फाउंडेशन अमरीकेची सगळ्यात मोठी दान देणारी संस्था आहे.

हेन्री फोर्डला लोक नेहमी नायाब आविष्कारकाच्या रुपात आठवतील.ज्याने पूर्ण जगाचा चेहरा बदलून टाकला.

**समाप्त**